गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली येथील प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास निधी वितरीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

## शासन निर्णय क्र.बांधका-२०२३/प्र.क्र.११५/विशि-२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २२ मार्च, २०२४.

**वाचा :** १. विभागाचा शासन निर्णय क्र.गोंविग-२०१२/(२६०/१२)/विशि-२, दि.२९.०३.२०१७.

२. विभाागाचा समक्रमांकाचा दि.११.०३.२०२४ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना :-**

राज्यात चंद्रपूर व गडचिरोली या दोन जिल्ह्यासाठी स्थापन केलेल्या गोंडवाना विद्यापीठाच्या "परीक्षा भवन" व "प्रशासकीय इमारत (पहिल्या व दुसऱ्या मजल्याचे)" बांधकामाच्या रुपये ४५७१.९३ लक्ष इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास वाचा क्र.१ येथील दि.२९.०३.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि या इमारतीच्या जागा बदल्याच्या कारणास्तव प्रशासकीय इमारतीची रु.१६९२.४० लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकाची प्रशासकीय मान्यता वाचा क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रद्द करण्यास व नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाच्या रु.६४,९७,१७,२५१/- इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन विद्ययापीठाच्या प्रशासकीय इमारत बांधकामासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली येथील प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी रु.५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) एवढा निधी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

२. **अटी व शर्ती :-**

१. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजुर केले आहे, त्याच उद्दिष्टासाठी वापर करावा आणि त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक (उच्च शिक्षण), पुणे यांचेमार्फत तात्काळ शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

२. बांधकामाची प्रगती शासनास वेळोवेळी अवगत करावी.

३. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

४. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरण परत्वे महालेखापाल-२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

३. सदरहू मंजूर झालेला निधी गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली यांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. वरील कामाकरीता खर्च "मागणी क्र. डब्ल्यु- ०२, मुख्य लेखाशीर्ष २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२ विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००) (२२) गोंडवाना विद्यापीठाची स्थापना ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०२ एच ५८१)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३८७/२०२४/व्यय-५, दि.१५.०३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३२६११२६३६४२०८ असा आहे. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHARAD
SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=be7c66207630576336152194 4ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2024.03.26 11:36:14 +05'30'

**( शरद कोकाटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. कुलगुरु, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली.
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.

६. महालेखापाल, (लेखा परीक्षण) - २, महाराष्ट्र, नागपूर.

७. कुलसचिव, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली.

८. सहसंचालक ( उच्च शिक्षण) नागपूर विभाग, नागपूर.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

१०.वित्त विभाग,(व्यय-५), (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.

११.कक्ष अधिकारी (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२.प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१३.उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१४.उप सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१५.अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.